डोमिहिरा नदी प्रकल्प, ता.जव्हार, जि.पालघर, या योजनेस तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
शासन निर्णय क्र. लपायो -२०२२/(प्र. क्र.६४)/खारभूमी
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १५ मार्च , २०२३

**पहावे :-**

१) शासन निर्णय क्रमांक डीएचआरए /१०८४/(१०२/८५)/खारभूमी, मंत्रालय, मुंबई दि.१६.१०.१९८५

२) शासन निर्णय क्रमांक लपायो /२०१३/(१३/२०००)/खारभूमी, मंत्रालय, मुंबई दि.१९.०१.२००१

३) शासन निर्णय क्रमांक लपायो/ २००५/(३४०/२००५)/खारभूमी, मंत्रालय, मुंबई दि.१०.०१.२०११

४) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांचे पत्र क्र. कोंपाविम/तृसुप्रमा-०३२२/ (प्र,क्र.०१/२०२२)/ तां.-५/ ८४६, दिनांक: १५.०३.२०२२ चे पत्र

५) वित्त विभागाचे पत्र क्र.व्यअस-२०२२/ प्र.क्र.१५८/ अर्थ-२ दि. २४ जानेवारी, २०२३

**प्रस्तावना:-**

डोमिहिरा नदी प्रकल्प या लघु पाटबंधारे योजनेअंतर्गत मौजे खडखड ता.जव्हार, जि. पालघर येथे डोमिहिरा नदीवर १४.४९ द.ल.घ.मी. क्षमतेचे मातीचे धरण बांधण्यात आले आहे. हा प्रकल्प कोंकण पाटबंधारे विकास महामंडळाअंतर्गत "उर्वरित महाराष्ट्र " या प्रदेशामध्ये आहे. या प्रकल्पाद्वारे जव्हार तालुक्यातील चार गावातील ६५७ हेक्टर क्षेत्र व मोखाडा तालुक्यातील एका गावातील २८ हेक्टर क्षेत्र असे एकूण ६८५ हेक्टर आदिवासी भागातील क्षेत्रास कालव्याव्दारे व बंदिस्त नलिकेद्वारे सिंचनाचा लाभ देणे नियोजित आहे.

सदर योजनेस संदर्भाधिन क्र.१ येथील दि. १६.१०.१९८५ च्या शासन निर्णया अन्वये प्रादेशिक दरसूची सन १९८३-८४ नुसार रु. ४.४८ कोटी रकमेस मूळ प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर योजनेस संदर्भाधिन क्र.२ येथील दि. १९.०१.२००१ च्या शासन निर्णया अन्वये प्रादेशिक दरसूची सन १९९९-२००० नुसार रु. २३.९९ कोटी रकमेस प्रथम सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर योजनेस संदर्भाधिन क्र.३ येथील दि. १०.०१.२०११ च्या शासन निर्णया अन्वये प्रादेशिक दरसूची सन २००३-०४ नुसार रु. ७३.४७ कोटी रकमेस व्दितीय सुधारित प्रशासकिय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर प्रकल्पाच्या सन २०१९-२० च्या दरसुचीवर आधारीत रु.१३५.८५ कोटी किंमतीच्या तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्तावाबाबत, राज्य तांत्रिक सल्लागार समिती.-२ (SLTAC-II) च्या दि. २१.०९.२०२१ रोजी झालेल्या ५७ व्या बैठकीत छाननी अहवालातील १ ते २७ मुद्दे विचारात घेण्याच्या अधीन राहून, समितीकडुन शिफारस करण्यात आली आहे.

हा प्रस्ताव व्यय अग्रक्रम समितीच्या दि. १३ जानेवारी, २०२३ च्या बैठकीत ठेवण्यात आला होता. व्यय अग्रक्रम समितीने सद्य:स्थिती, दरसूचीतील बदल, नवीन भूसंपादन कायदा, भूसंपादन खर्चात झालेली वाढ, संकल्पचित्रातील फेरबदल, गौण खनिज शुल्काच्या दरात झालेली सुधारणा इत्यादि किंमतवाढीची कारणमिमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन डोमिहिरा नदी प्रकल्प, ता.जव्हार, जि. पालघर या प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची सन २०१९-२० वर आधारित रु. १३५.८५ कोटी किंमतीस तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरून शासन पुढील आदेश निर्गमित करीत आहे.

**शासन निर्णय :-**

डोमिहिरा नदी प्रकल्प, ता.जव्हार, जि. पालघर या लघु पाटबंधारे प्रकल्पास जलसंपदा विभाग दरसूची सन २०१९-२० वर आधारित रु.१३५.८५ कोटी ( अक्षरी रुपये एकशे पस्तीस कोटी व पंच्याऐंशी लक्ष फक्त ) किंमतीस [प्रत्यक्ष कामासाठी रु. १३२.९८ कोटी व अनुषंगीक खर्च रु. २.८७ कोटी ] खालील अटींच्या अधीन राहून

तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाचा उपशिर्ष निहाय तरतूदींचा गोषवारा परिशिष्ट - "अ" मध्ये सोबत जोडला आहे.

१) सदर प्रकल्पाच्या तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रस्तावामध्ये अंतर्भुत किंमतीस तांत्रिक मान्यता प्राप्त करुन घ्यावी.

२) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशसकिय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करण्याची जबाबदारी संपुर्णपणे संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहील. या संदर्भात अंमलबजावणी करताना प्रचलीत शासन निर्णय, नियम, CVC ची मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक आहे व याची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत क्षेत्रिय कार्यालयांची राहील.

३) “डोमिहिरा नदी प्रकल्प, ता.जव्हार, जि. पालघर” या प्रकल्पासंदर्भात आधीच्या कालावधीमध्ये जर काही आर्थिक व कार्यपध्दतीत अनियमितता झाल्या असतील, कोणतीही नियमबाह्य कार्यवाही करण्यात आली असेल अथवा ज्यामुळे आर्थिक घोटाळा निर्माण होण्याची शक्यता असेल अशा कोणत्याही बाबींना वित्त विभागाने सहमती दिली आहे असे म्हणता येणार नाही व अशी कोणतीही सहमती/मान्यता वित्त विभागाने प्रस्तुत प्रकल्पाबाबत दिलेली नाही.

४) तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रिय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रिय अनियमिततेस मान्यता गृहित धरली जाणार नाही.

५) संपूर्ण प्रकल्प हा तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता किंमतीच्या मर्यादेत पूर्ण करावा.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी मुख्य लेखाशीर्ष "४७०२ लहान पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८००-इतर खर्च (१), सर्वसाधारण लघु पाटबंधारे योजना (१) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या (कार्यासन १४३४) अनौपचारिक संदर्भ क्र.१७६ /२०२२ , दिनांक २२.११.२०२२ अन्वये तसेच वित्त विभागाच्या (कार्यासन व्यय-१२) अनौपचारिक संदर्भ क्र.३५१/२०२२, दिनांक २८.११.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार तसेच दिनांक १३.०१.२०२३ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीमध्ये झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने निर्गमीत करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेली तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता लपा कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीत २४८ या अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३१५१८१५०३७१२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=b6bdca03112e343fc09cdae1147a23ad091dd823afbb7c549912fb806d1d1988, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E4FEAD3E1483D349ED241656A1F084DD45F2A44B5F36F642E970C90EF9F2D31F, cn=AMOL BAPURAO FUNDE
Date: 2023.03.15 18:22:21 +05'30'

**(अमोल फुंदे)**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**सहपत्र :- परिशिष्ट "अ" व “ब”**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे सचिव मुंबई

२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्ष नेते, विधानपरिषद/ विधानसभा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर.
८. वित्त विभाग (व्यय- १२), मंत्रालय, मुंबई -३२.
९. नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई -३२.
१०. जिल्हाधिकारी, पालघर
११. कार्यकारी संचालक, कोंकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे
१२. महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक.
१३. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोंकण प्रदेश, मुंबई
१४. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१६. उप सचिव (लपा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१७. अधिक्षक अभियंता, उत्तर कोंकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे
१८. अर्थ शाखा - १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
१९. खारभूमी कार्यासन (संग्रहार्थ).

## परिशिष्ट-अ

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र लपायो -२०२२/(प्र. क्र.६४/२०२२)/खारभूमी, दिनांक: १५ मार्च ,२०२३ चे परिशिष्ट)

**डोमिहिरा नदी प्रकल्प, ता.जव्हार, जि. पालघर तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता उपशिर्षनिहाय तरतूदी**

| अ.क्र. | उपशिर्ष | तृतीय सुप्रमा नुसार तरतुद (दरसूची सन २०१९-२०) रू. कोटी |
|---|---|---|
| **अ) शिर्ष कामे** | | |
| १. | अे - प्राथमिक | ०.४५ |
| २. | बी - भूसंपादन | २.९५ |
| ३. | सी - मुख्य कामे | ६९.५७ |
| ४. | डी - विमोचक | ६.६५ |
| ५. | जी.पूल | १.०० |
| ६. | के-इमारती | ०.४४ |
| ७. | एम-वृक्षारोपण | ०.०१ |
| ८. | ओ-संकीर्ण | ०.१५ |
| ९. | पी-देखभाल दुरुस्ती | ०.७७ |
| | **एकूण शिर्षकामे (अ)** | **८२.००** |
| **ब) कालवे व वितरण व्यवस्था** | | |
| १. | अे - प्राथमिक | ०.१८ |
| २. | बी - भूसंपादन | ७.७० |
| ३. | डी- विमोचक | ०.३३ |
| ४. | एफ-मोरीकामे | १७.१८ |
| ५. | जी-पुल | ०.२४ |
| ६. | एच-निकास | ०.२८ |
| ७. | एल मातीकाम/कालवा | १३.१६ |
| | एल मातीकाम/PDN | ११.०८ |
| ८. | एम-वृक्षलागवड | ०.०५ |
| ९. | ओ-संकीर्ण | ०.३४ |
| १०. | पी-देखभाल | ०.४२ |
| | **एकूण (ब)** | **५०.९८** |
| **एकूण कामे (अ+ब)** | | **१३२.९८** |
| **क) अनुषंगीक खर्च** | | **२.८७** |
| **एकूण (अ+ब+क)** | | **१३५.८५** |

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.15 18:23:02 +05'30'

**(अमोल फुंदे)**

**उप सचिव , महाराष्ट्र शासन**

## परिशिष्ट -ब

(शासन निर्णय जलसंपदा विभाग क्र लपायो -२०२२/(प्र. क्र.६४/२०२२)/खारभूमी, दिनांक: १५ मार्च ,२०२३ चे परिशिष्ट)

**योजनेची ठळक वैशिष्टेः-**

| | | |
|---|---|---|
| १. | डोमिहिरा योजनेची सिंचन क्षमता | ६८५ हेक्टर |
| २. | योजनेचा पाणीसाठा | १४.४९ द.ल.घ.मी |
| ३. | लाभव्यय गुणोत्तर | १.२३ (मापदंड १ पेक्षा अधिक) योजना मापदंडात बसते |
| ४. | आर्थिक परतावा दर | १२.५१ % ( मापदंड १२ % पेक्षा अधिक) योजना मापदंडात बसते |
| ५. | पाणीसाठा किंमत | रू. ९३,७५४/- प्रति सघमी ( प्रचलित मापदंड रू १,७६,७२० पेक्षा कमी ) योजना मापदंडात बसते. |

AMOL BAPURAO FUNDE

Digitally signed by AMOL BAPURAO FUNDE
DN: CN = AMOL BAPURAO FUNDE, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = WATER RESOURCES DEPARTMENT
Date: 2023.03.15 18:23:15 +05'30'

**(अमोल फुंदे)**

**उप सचिव , महाराष्ट्र शासन**